प्रादेशिक योजना - पुणे
महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ चे
कलम-२०(४) अन्वये फेरबदल मंजूर करणेबाबत.
मौ.हिंजवडी स.नं.१३८/१ मधुन जाणा-या रस्त्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
शासन निर्णय क्रमांक-टिपीएस-१८०६/२५२१/प्र.क्र.८१८/०७/नवि-१३
दिनांक :- १९.०६.२०१०

शासन निर्णय :- सोबतची शासकिय अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्रा मध्ये प्रसिध्द करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(वि. म. रानडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
जिल्हाधिकारी पुणे,
उपसंचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे.
सहाय्यक संचालक नगर रचना, पुणे शाखा, पुणे.
व्यवस्थापक, येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे.

(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची शासकीय अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्राच्या भाग-१, पुणे विभाग, पुणे पुरवणी भाग-१ मध्ये प्रसिद्ध करुन त्याच्या प्रत्येकी १० प्रती या विभागास, संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे, जिल्हाधिकारी, पुणे, उपसंचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे, सहाय्यक संचालक नगर रचना, पुणे शाखा, पुणे यांना पाठवाव्यात)

कक्ष अधिकारी (नवि-२९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

त्यांना विनंती करण्यात येते की, सदर अधिसूचना शासनाच्या वेबसाईटवर प्रसिद्ध करावी.

निवडनस्ती (नवि-१३).

## NOTIFICATION

**Government of Maharashtra**
**Urban Development Department,**
**Mantralaya, Mumbai 400 032.**

**Date – 19.06.2010**

No.TPS-1806/2521/C.R.818/07/UD-13

Maharashtra Regional & Town Planning Act 1966.

Whereas, the Government in Urban Development Department vide its Notification No. TPS-1895/227/CR-26/95/UD-13, dated 15th November 1997 has sanctioned the Regional Plan for Pune district (herein after referred to as "the said Regional Plan") under Section15 of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 (hereinafter referred to as "the said Act" so as to come into force with effect from 10th February 1998;

And whereas, as per the proposal of the said Regional Plan, a 30 mt. wide proposed road (hereinafter referred to as the "the said road") is passing through the lands bearing S.No.138/1 of Mouje Hinjawadi, Taluka Mulshi (hereinafter referred to as the said lands);

And whereas, Shri.M.D. Kolte has requested Government to reduce the road width of said road upto 12 mt.;

And whereas, after consultation with the Director of Town Planning, Maharashtra State, Pune, Government is of the opinion that it is necessary to reduce the width of part of the said road upto 15 mt. & to delete the portion of the said road passing through M.I.D.C. Area & the land so deleted from the said road proposal be included in adjoining Zone as shown on part plan and to modify the said Regional Plan as per provisions of Section 20(2) of the said Act, on the following conditions.

**Conditions:-**

1. All the required infrastructure facilities to the satisfaction of Collector, Pune shall be provided by the developer at his own cost.
2. The Amenity Space, Open Space & road shall be developed by the land owner as per notice dt.28.8.06 publishing by Govt.;

(hereinafter referred to as "the said modification")

And whereas, the notice regarding the proposed modification under sub section (3) of section 20 of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 (Maharashtra Act XXXVII of 1966) inviting suggestions/objections from General Public vide Urban Development Notice No. TPS-1806/2521/CR-818/07/UD-13 dated 13.08.2009 was published, which appeared in Maharashtra Government Gazette Part-I, Pune dated 08.10.2009 at page No.3339 to 3341. The Assistant Director of Town Planning, Pune Branch, Pune was appointed as an officer by Government to hear suggestions/objections and submit his report to Government (hereinafter referred to as "the said officer");

And whereas, after considering the report submitted by the said Officer and consulting the Director of Town

Planning Maharashtra State, Pune, Govt. is of the opinion that it is necessary to reduce the width of part of the said road upto 15 mt. & to delete the portion of the said road passing through M.I.D.C. Area & the land so deleted from the said road proposal shall be included in adjoining Zone with condition;

Now, therefore, in exercise of the powers conferred by sub-section (4) of section 20 of the said Act, the Government hereby finally sanctions the said modification proposal and for that purpose amends the notification sanctioning the said Regional Plan as follows-

In the schedule of Modifications appended to the Notification dated 25/11/1997 sanctioning the said Regional Plan after the last entry following new entry is added viz:-

**ENTRY**

"30 mt. wide proposed road passing through S.No.138/1 of Mouje Hinjawadi, Taluka Mulshi is reduced to 15 m. & land reduced thereunder is included in adjoining zone. The remaining portion of this 30 m. road passing through M.I.D.C. Area is deleted & included in adjoining zone as shown on plan".

**Conditions**:

1) All the required infrastructure facilities to the satisfaction of Collector, Pune shall be provided by the developer at his own cost.
2) The Aminity space open space & road shall be development by the land owner as per Govt. Notification date 28.8.2009.

**Note** :-

A. The plan bearing No.TPS-1806/2521/CR-818/07/UD-13 showing the said modification is available for inspection by the general public during office hours on all working days at the following offices for period of one month.
   1. The Deputy Director of Town Planning, Pune Division, Pune, S.No. 74/2, Sahakar Nagar, Above Bank of Maharashtra, Pune-9.
   2. The Collector of Pune.
   3. Assistant Director of Town Planning, Pune Branch, Pune, 283, Narayan Peth, Pune – 30

B) This notification is also published on Government web at www.urban.maharashtra.gov.in

By order and in the name of the Governor of Maharashtra,

(V. M. Ranade)
Under Secretary to Government

## अधिसूचना

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२-
दिनांक : ११.०६.२०१०

क्र. टिपीएस- १८०६/२५२१/प्र.क्र.८१८/०७/नवि-१३

प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६

ज्याअर्थी, पुणे जिल्हयाची प्रादेशिक योजना (यापुढे जिचा उल्लेख उक्त प्रादेशिक योजना असा करण्यात आला आहे) महाराष्ट्र शासनाच्या नगर विकास विभागाकडील अधिसूचना क्रमांक टीपीएस-१८९५/२२७/प्र.क्र.२६/ ९५/नवि-१३, दिनांक २५ नोव्हेंबर १९९७ अन्वये (यापुढे जिचा उल्लेख उक्त अधिसूचना असा करण्यात आला आहे) महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ (यापुढे ज्याचा उल्लेख उक्त अधिनियम असा करण्यात आला आहे) मंजूर केली असून ती दिनांक १० फेब्रुवारी १९९८ पासून अंमलात आली आहे;

आणि ज्याअर्थी, उक्त प्रादेशिक योजनेच्या प्रस्तावानुसार मौजे हिंजवडी, तालुका मुळशी येथील स.नं.१३८/१ या जमिनी (यापुढे ज्यांचा उल्लेख "उक्त जमिनी" असा करण्यात आला आहे) मधून ३० मी. रुंद रस्ता प्रस्तावित आहे (यापुढे ज्याचा उल्लेख "उक्त रस्ता" असा करण्यात आला आहे);

आणि ज्याअर्थी, अर्जदार संचालक, श्री.एम.डी. कोलते यांनी उक्त रस्त्याची रुंदी १२ मी. करण्याची विनंती शासनास केली आहे;

आणि ज्याअर्थी संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेशी विचारविनिमय करुन उक्त रस्त्याची एम.आय.डी.सी हद्दीपर्यंतची रुंदी १५ मी. करुन एम.आय.डी.सी. हद्दीमधील रस्ता वगळून वगळलेले रस्त्याखालील क्षेत्र लगतच्या झोन मध्ये समाविष्ट करणे आवश्यक आहे, असे शासनाचे मत आहे. उक्त जमिनी उक्त अधिनियमाच्या कलम २०(२) मधील तरतुदीनुसार रहिवास विभागात पुढील अटींसापेक्ष समाविष्ट करण्याकरिता उक्त प्रादेशिक योजना सुधारित करणे आवश्यक आहे;

अट क्रमांक १ - प्रश्नाधीन जमिनींकरिता आवश्यक असणा-या सर्व पायाभूत सुविधा विकासक स्वखर्चाने उपलब्ध करुन देतील.

अट क्रमांक २- शासनाचे दि.२८.८.०८ रोजी प्रसिध्द केलेल्या नोटीस मधील तरतुदीनुसार सुविधा क्षेत्र, खुली जागा, रस्ते यांचा विकास करणे आवश्यक राहील..

(यापुढे ज्याचा उल्लेख उक्त फेरबदल असा करण्यात आला आहे);

आणि ज्याअर्थी, उक्त अधिनियमाच्या कलम २० चे पोटकलम (३) च्या तरतुदीनुसार उक्त जमिनी शेती तथा ना विकास विभागातून वगळून औद्योगिक विभागात समाविष्ट करण्यासाठी शासनाच्या नगर विकास विभागाने क्र.टिपीएस-१८०६/२५२१/ प्र.क्र.८१८/०७/नवि-१३, दिनांक १८.०८.२००९ अन्वये आम जनतेच्या हरकती/सूचना मागविण्यासाठीची नोटीस महाराष्ट्र शासन राजपत्र, भाग-१ पुणे विभागीय पुरवणीत दिनांक ८.१०.२००९ रोजी पृ.क्र.३३३९ ते ३३४१ वर प्रसिध्द केली आणि विहित मुदतीत प्राप्त सूचना हरकती दाखल करणा-यांना सुनावणी देण्याकरिता व शासनास अहवाल

सादर करण्याकरिता अधिकारी म्हणून सहाय्यक संचालक नगर रचना, पुणे शाखा, पुणे यांची नियुक्ती करण्यात आली होती (यापुढे "उक्त अधिकारी" असे संबोधले आहे);

आणि ज्याअर्थी उक्त अधिका-यांचा प्राप्त अहवाल विचारात घेऊन व संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा सल्ला घेतल्यानंतर अटीसह उक्त रस्त्याची एम.आय.डी.सी हद्दीपर्यंतची रुंदी १५ मी. करुन एम.आय.डी.सी. हद्दीमधील रस्ता वगळून वगळलेले रस्त्याखालील क्षेत्र लगतच्या झोन मध्ये समाविष्ट करणे आवश्यक आहे, असे शासनाचे मत आहे;

त्याअर्थी आता उक्त अधिनियमाचे कलम २० चे पोटकलम (४) व त्या अनुषंगाने प्राप्त अधिकारात शासन उक्त जमिनीबाबत उक्त फेरबदल प्रस्तावास पुढील प्रमाणे मंजूरी देत आहे व त्यासाठी उक्त प्रादेशिक योजना मंजूरीच्या दिनांक २५/११/१९९७ च्या अधिसूचनेतील फेरबदलांच्या अनुसूचीमध्ये शेवटीच्या नोंदीनंतर पुढील नवीन नोंद समाविष्ट करण्यात येत आहे.

## नोंद

मौजे हिंजवडी, ता.मुळशी येथील स.नं.१३८/१ या जमिनी मधून जाणा-या ३० मी. रुंद रस्त्याची एम.आय.डी.सी हद्दीपर्यंतची रुंदी १५ मी. करुन व एम.आय.डी.सी. हद्दीमधील रस्ता वगळून वगळलेले रस्त्याखालील क्षेत्र लगतच्या झोन मध्ये खालील अटीस अधिन राहून समाविष्ट करणेत येत आहे.

अटी:-

अट क्रमांक १ - प्रश्नाधीन जमिनींकरिता आवश्यक असणा-या सर्व पायाभूत सुविधा विकासक स्वखर्चाने उपलब्ध करुन देतील.

अट क्रमांक २ शासनाचे दि.२८.८.०९ रोजी मंजूर केलेल्या अधिसूचनेमधील तरतुदीनुसार सुविधा क्षेत्र, खुली जागा, रस्ते यांचा विकास करणे आवश्यक राहील.

टिप :-

अ) उक्त मंजूर फेरबदल दर्शविणारा भाग नकाशा टिपीएस-१८०६/२५२१/प्र.क्र. ८१८/०७/नवि-१३, नागरिकांच्या अवलोकनार्थ कार्यालयीन कामकाजाच्या दिवशी कार्यालयीन वेळेमध्ये खाली नमूद केलेल्या कार्यालयामध्ये १ महिन्याच्या कालावधीसाठी ठेवण्यात आला आहे.

१) मा.उपसंचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे.

२) जिल्हाधिकारी, जिल्हा पुणे.

३) सहाय्यक संचालक नगर रचना, पुणे शाखा, पुणे,२८३ नारायण पेठ,पुणे- ३०.

(ब) सदर फेरबदलाची अधिसूचना शासनाच्या www.urban.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(वि.म.रानडे)

शासनाचे अवर सचिव, महाराष्ट्र राज्य.

Jan New file Notification-2010